**जलस्वराज्य - २ कार्यक्रम.**
अंजनगाव बारी, ता. व जि. अमरावती या वाढीव दरडोई खर्च असलेल्या शहरालगतच्या नळ पाणी पुरवठा योजनेस प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन
## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
## शासन निर्णय क्रमांकः जस्वप्र-०११७ / प्र. क्र. २२ / पापु-११

गोकुळदास तेजपाल रुग्णालय संकुल इमारत, ७ वा मजला,
नवीन मंत्रालय, लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई ४००००१
दिनांक : २७ फेब्रुवारी, २०१७

**वाचा :**

१) शासन निर्णय क्रमांकः जस्वप्र-१२१३ / प्र. क्र. २०० / पापु-११, दि. ०४/०१/२०१४
२) शासन निर्णय क्रमांकः जस्वप्र-०२१४ / प्र. क्र. ५५ / पापु-११, दि. ११/०६/२०१४
३) शासन निर्णय क्रमांकः जस्वप्र-०७१४/लेखा शाखा/प्र.क्र.११/ पापु-११, दि. ३०/०७/२०१४
४) शासन परिपत्रक क्रमांकःजस्वप्र-२/०७०८/ पर्यात/ प्र. क्र.११/ पापु-११, दि. ५/०८/२०१४
५) शासन निर्णय क्रमांकः निशायो-१४१३ / प्र. क्र. ८८ / पापु - ७, दि. ११/०९/२०१४
६) शासन निर्णय क्रमांकःजस्वप्र-०५१५/प्र.क्र.८५/ विसंक (तां) / पापु-११, दि. ०४/०६/२०१६
७) शासन निर्णय क्रमांकः जस्वका-२/०७१५/ विसंक (तां)/प्र. क्र.१३/ पापु-१, दि. १/१/२०१६
८) शासन निर्णय क्रमांकः जस्वका-२/०११६/ विसंक(तां)/ प्र.क्र.२१/पापु-११, दि. २/२/२०१६
९) शासन निर्णय क्रमांकः जस्वका-२/०५१५/विसंक(तां)/प्र.क्र.८५/पापु-११,दि. १९/८/२०१६

**प्रस्तावना :-**

जागतिक बँक अर्थसहाय्यित जलस्वराज्य-२ कार्यक्रमांतर्गत राज्यातील १२ जिल्ह्यांमध्ये मुख्य भौतिक गुंतवणूक करण्यात येत आहे. ग्रामीण पाणी पुरवठा व स्वच्छता सुविधांचे नियोजन, अंमलबजावणी, संनियंत्रण व शाश्वतता याबाबत या क्षेत्रातील संस्थांच्या कामगिरीचा दर्जा उंचावणे तसेच शहरालगतच्या, टंचाईग्रस्त व पाणी गुणवत्ताबाधित भागांमध्ये गुणवत्तापूर्ण व शाश्वत पाणी पुरवठा सेवा पुरविणे, हे या कार्यक्रमाचे मुख्य उद्दिष्ट आहे.

जलस्वराज्य-२ कार्यक्रमांतर्गत मुख्य भौतिक घटकांतर्गत शहरालगतच्या भागातील पाणी पुरवठा व स्वच्छता सुविधांची अंमलबजावणी अधिक प्रभावीपणे, गुणवत्तापूर्ण व नाविन्यपूर्ण पध्दतीने तसेच निर्धारित वेळेत करुन वाढीव दर्जाच्या शाश्वत पाणी पुरवठा व्यवस्थेचे प्रयोगनिर्देशन (Demonstration) करणे व एकंदर पाणी पुरवठा व स्वच्छता क्षेत्रातील कामगिरीचा दर्जा उंचावणे अपेक्षित आहे.

२. या कार्यक्रमांतर्गत जागतिक बँकेकडून मिळणारे अर्थसहाय्य हे Program for Results - PforR या वित्तिय साधनांतर्गत उपलब्ध होणार असून ते उद्दीष्टपूर्ती आधारित निधी संवितरण निर्देशकांशी (Disbursement Linked Indicators - DLIs) निगडीत आहे. PforR या तत्त्वावर आधारित असा हा देशातील पथदर्शी कार्यक्रम आहे. या कार्यक्रमासाठी जागतिक बँकेकडून ७०% अर्थसहाय्य उपलब्ध होणार असून राज्य शासनाकडून ३० % निधी देण्यात येणार आहे.

३. संदर्भाधिन क्र. २ मधील शासन निर्णयान्वये पात्रता निकषांनुसार गाव निवड प्रक्रिया करणे, विविध यंत्रणांमध्ये समन्वय साधणे इ. साठी जिल्हा स्तरावर मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांचे अध्यक्षतेखाली “जिल्हा कार्यक्रम समन्वय समिती” व शहरालगतच्या गावांमधील योजनांचे तांत्रिक पर्याय निवडण्यासाठी “जिल्हा तांत्रिक समिती” गठीत करण्यात आली आहे.

४. राज्यातील शहरालगतच्या भागातील पाणी पुरवठा व स्वच्छता योजनांची कामे यशस्वीरित्या राबविण्यासाठी तसेच सर्व योजनांच्या संकल्पनामध्ये एकवाक्यता व सुसूत्रता आणण्याकरिता जलस्वराज्य-२ कार्यक्रमांतर्गत शहरालगतच्या भागातील सर्व पाणी पुरवठा व स्वच्छता योजनांची अंमलबजावणी महाराष्ट्र जीवन प्राधिकरणामार्फत करण्याबाबतचा निर्णय संदर्भाधिन क्र. ७ मधील शासन निर्णयान्वये घेण्यात आला आहे.

५. शहरालगतच्या भागातील पाणी पुरवठा योजनांच्या सविस्तर प्रकल्प अहवालांची तांत्रिकदृष्ट्या तपासणी संचालक (तांत्रिक), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण यांचे अध्यक्षतेखालील राज्यस्तरीय पडताळणी उप समितीमार्फत करण्यात येते. तांत्रिकदृष्ट्या तपासणी झाल्यानंतर

तत्वत: मान्यतेसाठी परिपूर्ण सविस्तर प्रकल्प अहवालांचे सादरीकरण राज्यस्तरीय पडताळणी समितीसमोर करण्यात येते.

६. जलस्वराज्य-२ कार्यक्रमांतर्गत शासनाच्या विहित निकषांपेक्षा जास्त दरडोई खर्च असलेल्या योजनांना प्रशासकीय मान्यता देण्याचे अधिकार संदर्भ क्र. ७ अन्वये प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे अध्यक्षतेखालील राज्यस्तरीय पडताळणी समितीस देण्यात आले आहेत. त्या अनुषंगाने राज्यस्तरीय पडताळणी समितीच्या दि. ८/१२/२०१६ रोजीच्या बैठकीत अंजनगाव बारी, ता. व जि. अमरावती या वाढीव दरडोई खर्च असलेल्या नळ पाणी पुरवठा योजनेस प्रशासकीय मान्यतेची शिफारस करण्यात आली आहे.

७. अंजनगाव बारी, ता. व जि. अमरावती या नळ पाणी पुरवठा योजनेच्या रु. ७,३०,४०,४७९/- (निव्वळ) इतक्या किंमतीच्या अंदाजपत्रकास मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, अमरावती यांनी दि. १० जानेवारी, २०१७ रोजी तांत्रिक मान्यता प्रदान केली आहे. या मान्यतेच्या अनुषंगाने अंजनगाव बारी, ता. व जि. अमरावती या नळ पाणी पुरवठा योजनेच्या रु. ७,६७०/- एवढ्या वाढीव दरडोई खर्च असलेल्या रु. ७,९७,९०,६००/- (ढोबळ) इतक्या किंमतीच्या अंदाजपत्रकांस प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय :-

**अंजनगाव बारी, ता. व जि. अमरावती या शहरालगतच्या नळ पाणी पुरवठा योजनेच्या रु. ७,६७०/- एवढ्या वाढीव दरडोई खर्च असलेल्या रु. ७,९७,९०,६००/- (रु. सात कोटी सत्याण्णव लक्ष नव्वद हजार सहाशे ) इतक्या ढोबळ किंमतीच्या अंदाजपत्रकांस खालील अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.**

१. <u>योजनेची अंमलबजावणी</u>

i. सदर योजनेची अंमलबजावणी महाराष्ट्र जीवन प्राधिकरणामार्फत करण्यात यावी.

ii. जलस्वराज्य-२ कार्यक्रमांतर्गत जागतिक बँकेकडून उपलब्ध होणारे अर्थसहाय्य ठराविक उद्दिष्टपूर्ती निर्देशकांच्या आधारे प्राप्त होणार असल्याने योजनेमध्ये १००%

जलमापकासह नळजोडण्या देणे व सदर नळजोडण्यांमधून होणारा पाणी पुरवठा सातत्याने व समाधानकारकरित्या सुरु राहणे बंधनकारक राहील.

iii. योजनेच्या तांत्रिक मान्यता आदेशात नमूद केलेल्या अटी व शर्तींचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.

iv. योजनेसाठी आवश्यक उद्भव प्रमाणपत्र, पाणी आरक्षण, उपांगांसाठी लागणाऱ्या जमिनींची संमतीपत्रके, रस्ते / रेल्वे क्रॉसिंग तसेच इतर अनुषंगिक परवानग्या प्राप्त झाल्याशिवाय योजनेचे कार्यादेश देण्यात येवू नयेत.

v. योजनेचा उद्भव विकसित झाल्यानंतर पाणी नमुन्याची तपासणी केल्याशिवाय इतर कामे करु नयेत. योजनेचा उद्भव शाश्वत असल्याची तसेच त्यातून आवश्यकतेप्रमाणे पाणी उपलब्ध (Yield) होत असल्याची अधीक्षक अभियंता यांनी प्रत्यक्ष पाहणी केल्यानंतरच पुढील सर्व कामे हाती घेण्यात यावीत.

vi. योजनेची अंमलबजावणी करताना समाज व्यवस्थापन तत्वांचा अवलंब करणे तसेच संदर्भाधिन क्र. ४ मधील शासन परिपत्रकान्वये पर्यावरण व्यवस्थापनाबाबत दिलेल्या मार्गदर्शक सूचनांनुसार कार्यवाही करणे बंधनकारक राहील.

vii. गाव पातळीवर शाश्वत पाणी पुरवठा योजना यशस्वीरित्या चालविण्याच्या दृष्टीने योजनेच्या विविध टप्प्यांमध्ये (उदा. नियोजन, अंमलबजावणी तसेच देखभाल व दुरूस्ती - बहिर्गमन टप्पा) माहिती, शिक्षण व संवाद (IEC) कार्यक्रमाद्वारे सहाय्यकारी संस्थेमार्फत जनजागृती करण्याची जबाबदारी उप मुख्य कार्यकारी अधिकारी (पाणी व स्वच्छता), जिल्हा परिषद यांची राहील.

viii. योजनेच्या कामाचे नियोजन (Planning) Microsoft project मध्ये करण्यात यावे. तसेच योजनेची कामे विहीत कालावधीत पूर्ण करुन त्रैमासिक भौतिक व आर्थिक प्रगती अहवाल महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाने शासनास वेळोवेळी सादर करावा.

ix. योजनेतील भाववाढ ही निविदेत समाविष्ट न करता कंत्राटदाराने योजनेचे काम निविदा कालावधीपूर्व पूर्ण केल्यास निविदा किंमतीच्या १.८% पर्यंत प्रोत्साहन अनुदान कंत्राटदारास देण्यात येईल. यासाठी शासनाची पूर्व मान्यता घेणे आवश्यक आहे.

x. योजनेची अमंलबजावणी शासनाच्या प्रचलित धोरणानुसार ई-निविदा मागवून करण्यात यावी.

xi. योजनेमध्ये जलमापकासह नळजोडण्या प्रस्तावित करण्यात आल्या असून जलमापकाचा पुरवठा, नळजोडणी व पाण्याचे दर (volumetric) इ. बाबतचे सविस्तर आदेश स्वतंत्रपणे निर्गमित करण्यात येतील.

## २. सेवा पातळी मानक (Service Level Benchmark)

जलस्वराज्य-२ कार्यक्रमांतर्गत शहरालगतच्या भागातील पाणी पुरवठा योजनांसाठी खालील सेवा पातळी मानक (Service Level Benchmark) साध्य करणे बंधनकारक राहील.

| अ. क्र. | प्रस्ताविक निर्देशक (Proposed Indicator) | सेवा पातळी मानक (Service Level Benchmark) |
|---|---|---|
| १. | वैयक्तिक नळ जोडण्यांची व्याप्ती (Coverage of individual connections) | किमान ८० % |
| २. | जलमापकासह नळजोडणीचा विस्तार (Extent of metering of water connections) | किमान ८० % |
| ३. | पाणी पुरवठा योजना कार्यरत असणारा कालावधी (Duration of continuous water supply ) | वर्षातील किमान ३०० दिवस |
| ४. | दररोज नियमित पाणी पुरवठ्याचा कालावधी (Continuity of water supply ) | किमान ८ तास |
| ५. | वितरण व्यवस्थेवरील दाब (Residual head) | किमान ७ मीटर |

## ३. पूर्णत्वाचा दाखला व हस्तांतरण

i. योजनेची १०० % भौतिक कामे पूर्ण झाल्यानंतर कंत्राटदार, ग्रामपंचायत व जिल्हा तांत्रिक समितीचे सदस्य यांनी संयुक्त पाहणी करावी. जिल्हा तांत्रिक समितीच्या शिफारशीनंतर कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण यांनी योजना

भौतिकदृष्ट्या पूर्ण झाल्याचे प्रमाणपत्र दिल्यानंतर योजना पूर्ण झाली असे समजण्यात येईल.

ii. भौतिकदृष्ट्या पूर्ण झालेली योजना स्थानिक स्वराज्य संस्थेस (संबंधित ग्रामपंचायत / जिल्हा परिषद) त्वरीत हस्तांतरित करण्यात यावी.

## ४. देखभाल व दुरुस्ती

i. योजनेची भौतिक कामे पूर्ण झाल्यानंतर योजना स्वयंनिर्भर होण्याच्या दृष्टीने योजनेच्या वार्षिक देखभाल व दुरुस्ती अंदाजपत्रकास ग्रामसभेची मान्यता घेवून आवश्यक पाणीपट्टी आकारणे तसेच ५ वर्षांच्या कालावधीसाठी मूळ / ग्रामपंचायतीने नियुक्त केलेल्या कंत्राटदाराकडून अथवा ग्रामसभेच्या स्वतंत्र प्रक्रियेद्वारे देखभाल व दुरुस्ती करुन घेण्याची जबाबदारी ग्रामपंचायतीची राहील.

ii. सुरुवातीच्या १ वर्षासाठीच्या देखभाल व दुरुस्तीसाठीची तरतूद सविस्तर प्रकल्प अहवालात करण्यात आली आहे. त्यानंतरच्या ४ वर्षांच्या देखभाल व दुरुस्तीसाठी कामगारांचा पगार, वीज देयके व जलशुद्धीकरणासाठी लागणारी रसायने इ. करिता लागणारा खर्च कंत्राटदारास देण्याची जबाबदारी संबंधित ग्रामपंचायतीची राहील. हा खर्च ग्रामपंचायतीने पाणीपट्टी वसूलीच्या रकमेमधून करावा.

iii. योजना चालविणे तसेच योजनेच्या देखभाल व दुरुस्तीसाठी शासनामार्फत कोणत्याही प्रकारचे अनुदान देण्यात येणार नाही.

## ५. त्रयस्थ तांत्रिक परीक्षण

i. जलस्वराज्य-२ कार्यक्रमांतर्गत पाणी पुरवठा योजनांचा दर्जा व सेवा पातळी मानकांची (Service Level Benchmark) पडताळणी करण्यासाठी जागतिक बँकेमार्फत आंतरराष्ट्रीय स्तरावरील त्रयस्थ पडताळणी यंत्रणेची (Independent Verification Agency - IVA) नेमणूक करण्यात आलेली आहे.

ii. आंतरराष्ट्रीय स्तरावरील त्रयस्थ पडताळणी यंत्रणेकडून तपासणी करण्यापूर्वी योजनेच्या कामाचे / साहित्याचे गुणवत्तेच्या दृष्टीने तांत्रिक परीक्षण महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाच्या गुणवत्ता परीक्षण पथकाकडून किमान २ वेळा ( योजनेची २० ते ३०% कामे पूर्ण झाल्यानंतर व योजनेची ६० ते ७०% कामे पूर्ण झाल्यानंतर ) करण्यात यावे व याबाबतचा अहवाल शासनास सादर करावा.

६. <u>निधी वितरण</u>

i. योजनेच्या अंमलबजावणीसाठी निधी वितरण संदर्भाधिन क्र. ७ मधील शासन निर्णयात नमूद केल्याप्रमाणे राहील.

ii. अभियांत्रिकी सल्लागाराने तयार केलेल्या सविस्तर प्रकल्प अहवालांचे / सुधारणा कामाचे देयक अदा करण्यासाठीची तरतूद सविस्तर प्रकल्प अहवालात करण्यात आली आहे. सदर देयकाची अदायगी सुधारणा सहाय्य व प्रकल्प व्यवस्थापन कक्षामार्फत करण्यात येईल.

iii. कोणत्याही कारणाने योजनेच्या खर्चात वाढ झाल्यास वाढीव खर्चापोटी कोणत्याही प्रकारचे शासकीय अनुदान उपलब्ध करुन दिले जाणार नाही.

या योजनेवर होणारा खर्च भारतीय रिझर्व बँक, मुंबई येथे उप सचिव तथा प्रकल्प संचालक, सुधारणा सहाय्य व प्रकल्प व्यवस्थापन कक्ष यांचे नावे उघडण्यात आलेल्या स्वीय प्रपंजी खाते क्र. ६१८४३५००१० मधील उपलब्ध निधीमधून भागविण्यात येईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०२२७१२३९३९२१२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vidya Ramappa Hampayya

Digitally signed by Vidya Ramappa Hampayya
Date: 2017.02.27 15:48:46 +05'30'

(विद्या हम्पय्या)
शासनाचे अवर सचिव

**प्रत :-**

१. मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.

२. मा. मंत्री (पाणी पुरवठा व स्वच्छता) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

३. मा. विधानसभा / विधानपरिषद सदस्य (सर्व), महाराष्ट्र विधीमंडळ सचिवालय, मुंबई.

४. मुख्य सचिव यांचे उप सचिव, मंत्रालय, मुंबई.

५. प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई.

६. विभागीय आयुक्त, प्रादेशिक विभागीय कार्यालय, अमरावती.

७. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई.

८. संचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे.

९. संचालक (तांत्रिक), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई.

१०. मुख्य अभियंता तथा विशेष कार्य अधिकारी, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई.

११. संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, सिडको भवन, बेलापूर, नवी मुंबई.

१२. संचालक (वित्त), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, सिडको भवन, बेलापूर, नवी मुंबई.

१३. महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), मुंबई.

१४. महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता),नागपूर.

१५. जिल्हाधिकारी, अमरावती.

१६. मुख्य अभियंता, प्रादेशिक विभाग, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, अमरावती.

१७. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, अमरावती.

१८. अधीक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण मंडळ, अमरावती.

१९. उप मुख्य कार्यकारी अधिकारी (पाणी व स्वच्छता), जिल्हा परिषद, अमरावती.

२०. कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, अमरावती.

२१. कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, अमरावती.

२२. वरिष्ठ भूवैज्ञानिक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, अमरावती.

२३. निवड नस्ती (कार्यासन पापु-११), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, बेलापूर, नवी मुंबई.

२४. निवड नस्ती (कार्यासन पापु-४, ५, ७, २०), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई.